**सन १९७६ नंतरच्या पाटबंधारे प्रकल्प बाधीत पुनर्वसित गावांना देण्यात आलेल्या नागरी सुविधा बाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.आरपीए-२०१७/प्र.क्र २१(१)/र-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २६ जुन, २०१८.

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक आरपीए-२०१५/ प्र.क्र. २१४/र-१, दिनांक २३/०९/२०१५
२) शासन निर्णय क्रमांक : पुनर्व-२०१५/प्र.क्र. २५/र-८, दिनांक १९/११/२०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम - १९९९ मधील तरतुदींनुसार पाटबंधारे प्रकल्पामुळे बाधित होणा-या गावठाणाचे नविन वसाहतीत पुनर्वसन करण्यात येते. पुनर्वसीत गावठाणात स्थलांतरित होतांना प्रकल्पग्रस्तांना अनेक अडचणी येतात. प्रकल्प कार्यान्वित करण्याचा कालावधी मोठा असल्यामुळे नागरी सुविधांच्या हस्तांतरणात येणा-या अडचणी लक्षात घेऊन पुनर्वसित गावठाणातील नागरी सुविधांच्या देखभाल व दुरूस्ती बाबत निश्चित धोरण ठरवण्याची आवश्यकता आहे. जेणे करुन प्रकल्पग्रस्तांना देण्यात येणा-या नागरी सुविधा या दर्जेदार असतील तसेच त्यांची योग्य ती देखभाल होईल व प्रकल्पग्रस्तांना चांगल्या दर्जाच्या सुविधा मिळाल्यामुळे त्यांच्या दैनंदिन अडचणी दूर होतील. त्यानुसार सन १९७६ नंतरच्या पाटबंधारे प्रकल्पबाधित पुनर्वसित गावांना देण्यात आलेल्या नागरी सुविधा तसेच यापुढे प्रकल्पबाधीत पुनर्वसित गावांना देण्यात येणाऱ्या नागरी सुविधा पुढीलप्रमाणे धोरणात्मक निर्णय घेण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

१) पर्यायी गावठाणाची जागा निश्चित करतांना या गावठाणांसाठी शाश्वत पिण्याच्या पाण्याचा स्रोत हा प्राधान्याचा निकष असावा. पर्यायी गावठाणासाठी निवडलेला पिण्याचा पाण्याचा स्रोत शाश्वत व पुरेसा असल्याबाबतचे प्रमाणपत्र प्रकल्पाचे अधिक्षक अभियंता यांनी गावठाण्याची जागा निश्चित करण्यापूर्वी दयावे.

२) गावठाणातील प्रत्येक प्लॉटमध्ये नळाद्वारे पाणी उपलब्ध करुन दयावे.

सदर शासन निर्णय हा हस्तांतरीत न झालेल्या कामांसाठी मर्यादित असुन जलसंपदा विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ.सं.क्र ३३७/व्यय-१०, दि.२९/१२/२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२६११२२३१००१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Shivaji P Karwar

Digitally signed by Shivaji P Karwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, cn=Shivaji P Karwar
Date: 2018.06.26 11:33:02 +05'30'

**( शिवाजी कारवार )**
कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) मा. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) सव जिल्हाधिकारी,
९) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
१०) सर्व कार्यासन (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) निवड नस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.